**चिखलदरा, जिल्हा अमरावती येथे ग्राम न्यायालय स्थापन करण्यास आणि या न्यायालयासाठी पद निर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ग्रामन्या २०२२/ प्र.क्र.१६२/का.१२,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: - ०७ जुलै , २०२३

<u>वाचा :-</u>

१ प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक बी (डब्ल्यू) ए १९०९ of २००९/१६८०/२७९५७, दिनांक १९ ऑगस्ट, २०२२.

<u>प्रस्तावना :-</u>

चिखलदरा, जिल्हा अमरावती येथे ग्राम न्यायालय अधिनियम २००८ अंतर्गत ग्राम न्यायालय स्थापन करण्याचा निर्णय मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे स्तरावर गठीत मा. न्यायाधिश यांच्या समितीने घेतला असल्याने चिखलदरा, जिल्हा अमरावती येथे ग्राम न्यायालय स्थापन करण्याची व या ग्राम न्यायालयासाठी पदनिर्मिती करण्याची शिफारस प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी दिनांक १९ ऑगस्ट, २०२२ रोजीच्या पत्रान्वये केली आहे. त्या अनुषंगाने चिखलदरा, जिल्हा अमरावती येथे ग्राम न्यायालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे :

**शासन निर्णय :-**

चिखलदरा, जिल्हा अमरावती येथे चिखलदरा या तालुक्याच्या परिसीमेत येणा-या खेड्यांसाठी ग्रामन्यायालय स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, या न्यायालयासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :

**ग्राम न्यायालय चिखलदरा , जिल्हा अमरावती**

| अ. क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | नव्याने निर्माण केलेली पदे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ |
| १ | दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी | Pay in Judiciary Services | १ |
| २ | लघुलेखक ग्रेड ३ | एस १४ ३८६००-१२२८०० | १ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | एस ८ २५५००-८११०० | १ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | एस ६ १९९००-६३२०० | १ |
| ५ | बेलिफ कम शिपाई | एस ६ १९९००-६३२०० | १ |
| ६ | दुभाषी | एस १० २९२००-९२३०० | १ |
| ७ | वाहनचालक | एस ६ १९९००-६३२०० | १ |
| | एकूण | | ७ |

२. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी अचलपूर या न्यायालयातील न्यायिक अधिकारी व कर्मचारी ग्राम न्यायालय चिखलदरा या ग्राम न्यायालयाचे कामकाज पाहतील. ही नवीन पदे निर्माण केल्यामुळे कोणत्याही प्रकारे नवीन पदभरती होणार नाही व ग्रामन्यायालयाचे कामकाज उपलब्ध कर्मचा-यांकडूनच काम करुन घेण्यात येईल.

३. उपरोक्त नमूद पदे ही भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दिनांक ३१ ऑगस्ट २०२३ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. यासाठी होणारा खर्च संबंधित आर्थिक वर्षात निधिची तरतुद करुन "मागणी क्रमांक जे १, २०१४- न्यायदान (००) (१०५) दिवाणी व सत्र न्यायालये (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश (०२)(०२) ग्राम न्यायालय अधिनियम २००८ अंतर्गत ग्राम न्यायालयाची स्थापना (केंद्रीय सहाय्य) (२०१४ ०४७७) दत्तमत" या लेखाशीर्षाखालील उद्दीष्टांसाठी अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक २८ जून, २०२३ रोजीच्या बैठकीत झालेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक६६१/२०२२/आपुक, दिनांक २३.११.२०२२ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६६५ /२०२३/व्यय-५, दिनांक ०३.०७.२०२३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०७१७५२०६३४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.07.07 17:53:06 +05'30'

**( विलास व्ही. गायकवाड )**
**विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरीषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरीषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरीषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
९. मा.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,

१०.मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

११.मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई,

१२.सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,

१३.सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,

१४.संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,

१५.प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,

१६.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,

१७.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,

१८. महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,

१९.महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,

२०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२१.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

२२.दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी अचलपूर, जिल्हा अमरावती,

२३.जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,

२४.उप जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,

२५. वित्त विभाग, व्यय ५ / आ.पु.क. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२६.विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने

२७.निवडनस्ती (का.१२)